**विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक या कार्यालयातील "प्रशासकीय अधिकारी" या पदावरील प्रपत्र बढतीच्या ( प्रतिनियुक्तीच्या ) कालावधीस मुदतवाढ देणेबाबत**

**श्रीमती रुपाली भ.लाटे, कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि-११२४/प्र.क्र.२२/प्रशा-२ (१४ब)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक:- १५ मार्च, २०२४

**संदर्भ:-** १) साप्रवि, शासन आदेश क्र.प्रतिनि-२५२१/प्र.क्र.७९/१४अ, दिनांक ०६.०८.२०२१
२) साप्रवि, शासन आदेश क्र.एएससी-१५२३/प्र.क्र.८४/१४अ, दिनांक २८.०७.२०२३
३) साप्रवि, शासन आदेश क्र.कअप-१२२२/प्र.क्र.६५/१४ब, दिनांक २५.०८.२०२३

**शासन आदेश**

श्रीमती रुपाली भ.लाटे, तत्का. सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांची संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ०६.०८.२०२१ रोजीच्या आदेशान्वये गृह विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक या कार्यालयातील "**प्रशासकीय अधिकारी**" या पदावर प्रथमत: २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्रीमती लाटे या सदर कार्यालयात दिनांक १०.०८.२०२१ पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत होत्या. तद्नंतर श्रीमती लाटे यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक २८.०७.२०२३ रोजीच्या आदेशान्वये ०२ वर्षे म्हणजेच दिनांक ०९.०८.२०२५ पर्यत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. दरम्यानच्या कालावधीत संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक २५.०८.२०२३ रोजीच्या आदेशान्वये श्रीमती रुपाली भ.लाटे यांना कक्ष अधिकारी या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली असून त्यांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीनंतरची पदस्थापना प्रपत्र बढतीने विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक या कार्यालयातील "**प्रशासकीय अधिकारी**" या पदावर करण्यात आली होती. सदर प्रपत्र बढतीची मुदत दिनांक २४.०२.२०२४ रोजी संपुष्टात आली आहे.

३. आता या आदेशान्वये श्रीमती रुपाली भ.लाटे, कक्ष अधिकारी यांच्या गृह विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक या कार्यालयातील "**प्रशासकीय अधिकारी**" या पदावरील प्रपत्र बढतीच्या (प्रतिनियुक्तीच्या) कालावधीस दिनांक १०.०९.२०२५ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे. श्रीमती लाटे यांना यापुढे कोणतीही मुदतवाढ अनुज्ञेय होणार नाही.

४. श्रीमती लाटे यांच्या प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने संदर्भाधीन दिनांक ०६.०८.२०२१ रोजीच्या शासन आदेशातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२२५४५४०३०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0c6f092192cae76ac289eef2587c5f28373c6e445e4552e27b340b424d48717c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F960CA130E1B6E0A979CBB41C7516CA46961184AD1E4ECE1A118390C02E6745E, cn=VIVEK RAMAKANT JADHAV
Date: 2024.03.15 23:03:57 +05'30'

**( वि. र. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती रुपाली भ.लाटे, प्रशासकीय अधिकारी, विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक

**प्रतः-**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) अमुस/प्रधान सचिव/सचिव, जलसंपदा विभाग व गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सह/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) सह /उप सचिव (पोल-१४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) पोलीस उप आयुक्त तथा कार्यालय प्रमुख, विभागीय पोलीस तक्रार प्राधिकरण, नाशिक
६) निवड नस्ती/प्रशा-२(१४ब)